**जिल्हा न्यायालय, कोपरगांव, जि.अहमदनगर येथील नवीन इमारतीमध्ये दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) यांची दोन न्यायालये व दिवाणी न्यायालय (कनिष्ठ स्तर) यांची तीन न्यायालये अशी एकूण पाच न्यायालय स्थंलातरीत करण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण १११८/१०५१/प्र.क्र.१७२/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ११ जानेवारी, २०१९

संदर्भ: १. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.B(W)६०६५/१९८९/१९३४/३०२८६, दि.२१/८/२०१८
२. जिल्हा न्यायालय, अहमदनगर यांचे पत्र क्र.HKW/BLD/१५४८०/२०१७, दि.२०/१२/२०१७

**प्रस्तावना-**

मा.उच्च न्यायालयाच्या इन्फास्ट्रक्चर कम बिल्डींग कमिटीने कोपरगांव येथील न्यायालयाची जुनी इमारत पाडून त्या जागी नवीन इमारत बांधण्याबाबतचा प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश यांचा प्रस्ताव मान्य केला आहे. अशी कार्यवाही करत असताना सदर नवीन इमारत तयार होईपर्यंत दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) यांची दोन न्यायालये व दिवाणी न्यायालय (कनिष्ठ स्तर) यांची तीन न्यायालये अशी एकूण पाच न्यायालये जिल्हा न्यायालय, कोपरगांव येथे स्थलांतरीत करावी लागणार आहेत. त्यासाठी न्यायालयीन इमारतीमध्ये आवश्यक ते तात्पुरते बदल करावे लागणार आहेत. या कामसाठी येणाऱ्या खर्चाच्या रु.६६,६५,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास मा.उच्च न्यायालयाच्या बिल्डिंग कमिटीने मान्यता दिलेली आहे व त्यानुसार मा.उच्च न्यायालयाने संदर्भीय क्र.१ येथील पत्रान्वये प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्धतेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

सदर अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, संगमनेर यांनी तयार केले असून अधिक्षक अभियंता, सा.बां.वि.अहमदनगर व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर यांनी सांक्षाकित केले आहे. तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर अंदाजपत्रक तपासून प्रशासकीय मान्यतेस सहमती दर्शविली आहे. त्यानुसार दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) यांची दोन न्यायालये व दिवाणी न्यायालय (कनिष्ठ स्तर) यांची तीन न्यायालये अशी एकूण पाच न्यायालये जिल्हा न्यायालय, कोपरगांव येथे स्थलांतरीत करण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

कोपरगांव जिल्हा अहमदनगर येथे नवीन इमारतीचे बांधकाम करण्यासाठी अस्तित्वास असलेल्या दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) यांची दोन न्यायालये व दिवाणी न्यायालय (कनिष्ठ स्तर) यांची तीन न्यायालये अशी एकूण पाच न्यायालये जिल्हा न्यायालय, कोपरगांव येथे स्थलांतरीत करण्यासाठी येणाऱ्या रु.६२,६०,१००/- (अक्षरी रुपये बासस्ट लाख साठ हजार शंभर फक्त) इतक्या रकमेच्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपयात) | कामाचे स्वरुप (सा. बां.वि प्रमाणे) | सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविलेली रक्कम (रुपयात) |
|---|---|---|---|---|
| 1 | Shifting of Court | 50,98,262/- | Shifting of Court | 50,98,262/- |
| 2 | Add Labour and Furniture Charges | 1,50,000/- | Add Labour and Furniture Charges | 1,50,000/- |
| 3 | Add Electrification Charges | 4,00,000/- | Add Electrification Charges | 4,00,000/- |
| 4. | Add 15% for G.S.T. | 10,16,687/- | Add 12% for G.S.T. | 6,11,791/- |
| एकूण | | ६६,६५,०००/- | एकूण | ६२,६०,१००/- |

२. यावरील खर्च "मागणी क्रमांक जे-१, २०१४- न्यायदान, (००) १०५- दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश - (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश, (२०१४ ०१७२) दत्तमत, २७ लहान बांधकामे" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. याबाबत सन २०१८-२०१९ मध्ये निधी पुनर्विनियोजनाने भागवावा व त्यापुढे विहित मार्गाने निधी अर्थसंकल्पित करुन तो भागवावा.

३. सदर प्रकरणी प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रिया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर विहीत नियमानुसार अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी. तसेच या प्रकरणी तांत्रिक मान्यतेपेक्षा जास्त खर्च होणार नाही व खर्च वाजवी राहिल याबाबतची दक्षता संबंधितानी घ्यावी.

४. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौ.सं.क्र.६११/इमा.२, दि.३१/१२/२०१८ अन्वये तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र, अविअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/४/२०१५, मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-तीन, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्र. २७(२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१११५२४५४७११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Santosh Sampatti Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Santosh Sampatti Navagire
Date: 2019.01.11 15:33:38 +05'30'

**( सं.सं.नवगिरे )**
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,

२) प्रबंधक (निरिक्षणे-२) उच्च न्यायालय (अ.शा.), मुंबई (पत्राने)

३) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर,

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,

५) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर,

६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,

७) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई,

८) विधि व न्याय विभाग (का.२३), मंत्रालय, मुंबई,

९) निवड नस्ती (कार्यासन ११).